**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना**
**रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कचे बांधकाम करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: सावियो-२०२४/प्र. क्र. २०७ /अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १६ जुलै, २०२४.

वाचा: १. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, दिनांक ०९ मार्च, २०१८.
२. शासन शुद्धीपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, दिनांक २८ जुलै, २०२१.
३. जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र, दिनांक ०४ मार्च, २०२४.
४. प्रशासक तथा मुख्य अधिकारी, रत्नागिरी नगरपरिषद, रत्नागिरी यांचे पत्र, दिनांक २५ व २९ एप्रिल, २०२४.
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०५ जानेवारी, २०१५.

प्रस्तावना:

जिल्हाधिकारी, रत्नागिरी आणि प्रशासक तथा मुख्य अधिकारी, रत्नागिरी नगरपरिषद, रत्नागिरी यांच्या उपरोक्त वाचा येथील पत्रांन्वये भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कचे बांधकाम करण्याचा प्रस्ताव सादर झालेला आहे.

२. सदर प्रस्तावित रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कचे बांधकाम करण्याचे आराखडे / नकाशे RK Associates, कोल्हापूर यांनी तयार केलेले असून Municipal Engineer, रत्नागिरी नगरपरिषद स्वाक्षरीत आहेत. सदर बांधकामाचे रुपये १४८७.३९ लक्ष इतक्या रकमेचे अंदाजपत्रके Municipal Engineer, रत्नागिरी नगरपरिषद यांनी तयार केलेले आहेत. सदर बांधकामाचे अंदाजपत्रके S.S.R. of Maharashtra for the year २०२२-२३ आधारित आहेत. सदर बांधकामाची विहित मार्गाने तयार करण्यात आलेल्या रूपये १४८९.३९ लक्ष इतक्या रकमेच्या RECAPITULATION SHEETवर मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांनी स्वाक्षरी केलेली असून तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

३. सदर अंदाजपत्रकांची सार्वजनिक बांधकाम विभागाने (क्षेत्रिय स्तरावरील) तपासणी केलेल्या रुपये १४८७.३९ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची आणि निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय:

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कचे बांधकाम करण्याच्या प्रस्तावाच्या रुपये १४८७.३९ लक्ष इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत असून पुढील कोष्टकाप्रमाणे निधी वितरीत करण्यात येत आहे / यावा:

(रुपये लाखात)

| अ. क्र. | वर्ष | निधी (रुपये) |
|---|---|---|
| १. | २०२४-२५ | ५००.०० |
| २. | २०२५-२६ | ५००.०० |
| ३. | २०२६-२७ | ४८७.३९ |
| **एकूण** | | **१४८७.३९** |

२. सदर प्रशासकीय मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्रमांक १३४ (३) अनुक्रमांक ३मधील सुधारित अट १(अ) अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार प्रदान करण्यात येत आहे.

३. सन २०२४-२५साठी वितरीत करण्यात आलेल्या रुपये ५००.०० लक्ष निधीचा विनियोग झाल्याचे जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांच्या स्वाक्षरीचे कागदपत्रे / उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर कागदपत्रे / उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर झाल्यावर या कार्यासनाशी (अजाक) संबंधित अधिकारी प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, मुंबई किंवा सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, रत्नागिरी यांच्यासह प्रस्तुत रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कच्या बांधकामाची स्थळ पाहणी करतील. सदर संबंधित अधिकारी स्थळ पाहणी करुन पुढील वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत ना हरकत प्रमाणपत्र देतील. सदर ना हरकत प्रमाणपत्र दिल्यानंतर सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, रत्नागिरी यांच्यामार्फत दुसऱ्या वर्षासाठी निधीची मागणी करण्यात यावी. त्यानंतर शासनाकडून प्रस्तुत प्रस्तावास निधी वितरीत करण्यात येईल.

४. प्रस्तुत रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कचे बांधकाम करण्यासाठी येणारा खर्च:

मागणी क्रमांक एन-३

मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण

०१, अनुसूचित जातींचे कल्याण

(०४) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना

(०४) (०१) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)

२७, लहान बांधकामे

२२२५ F०८५

या अंतर्गत सन २०२४-२५, २५-२६ व २६-२७ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा / येईल.

५. प्रस्तुत रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कचे बांधकाम करताना विषयांकित योजनेचे नियम, तरतुदी, बाबी, अटी आणि वित्तीय अधिकारांतर्गत असलेल्या अटी यांचे पालन होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

६. तसेच, प्रस्तुत रत्नागिरी नगरपरिषद हद्दीमध्ये भीम पार्कचे बांधकाम करताना पुढील बाबींची पूर्तता करण्याची जबाबदारी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील संबंधित सहाय्यक आयुक्त, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त व आयुक्त यांची राहील:

अ. काम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजुरी घेऊनच सुरु करावे.

ब. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क. प्रत्यक्ष काम करतेवेळी शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक: इएनव्ही-२०१३/ प्र. क्र. १७७ / तां. क. १, दिनांक १० जानेवारी, २०१४मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक: बीडीजी - २०१७/ प्र. क्र. ६०/ इमा-२, दिनांक ०७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

फ. सदर अंदाजपत्रकावर उपभोक्ता विभागाच्यावतीने सक्षम प्राधिका-याचे साक्षांकन आवश्यक आहे.

७. सदर शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ यातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१६१८५००४६५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2024.07.18 16:00:07 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई.
८. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, मुंबई.
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी.
१०. कार्यकारी अभियंता, उत्तर रत्नागिरी, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.
११. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्रमांक ४, रत्नागिरी.
१२. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, नाशिक.
१३. प्रशासक तथा मुख्य अधिकारी, रत्नागिरी नगरपरिषद, रत्नागिरी.
१४. Municipal Engineer, रत्नागिरी नगरपरिषद, रत्नागिरी.
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.